# ई-मानस करिता

'मी अजूनही संगीताची विद्यार्थिनीच-लता मंगेशकर'ही बातमी वाचली.(लोकसत्ता, २५ सप्टेंबर).त्यात 'दीनानाथ मंगेशकर आणि इतर सर्व गायक संगीतकारांची गाणी एकाच ठिकाणी उपलब्ध व्हावीत अशी एखादी संस्था काढण्याचे मनात होते.पण त्यासाठी जागा मिळाली नाही म्हणून तो विचार मनातून गेला'असं त्या म्हणतात.सुदैवाने गेली पन्नास साठ वर्षे देशविदेशातले शेकडो 'नादलुब्ध' व संग्राहक कोणतंही पाठबळ नसतांना, प्रसंगी 'पदरमोड' करूनही हया कामात गुंतलेले आहेत.इंदौरपासच्या 'पिगडम्बर' नावाच्या एका आडगावात सुमन चौरास्यिा नावाच्या अवलियाने हजारो ध्वनिमुद्रिकांचं संग्रहालय उभारलं असून त्याला 'लता दीनानाथ मंगेशकर ग्रामोफोन रेकॉर्ड संग्रहालय' असं नाव दिलं आहे.त्याकडं घेऊन जाणा-या रस्त्याला स्थानिक प्रशासनानं 'लता मंगेशकर मार्ग' हे नावही दिलेलं आहे.तंत्रज्ञानाच्या किमयेनं लताजीनी गायिलेली सर्वच्या सर्व साडेपाच / सहा हजार गाणी पेन ड्राइव्ह, आयपॉड व इंटरनेट वर उपलब्ध करून द्यायच्या खटपटीतही बरीच मंडळी आहेत.

'रूग्णसेवा' प्राधान्यक्रमावर असल्यानं दीनानाथ मंगेशकर रूग्णालयाच्या बाजूला आणखी एक रूग्णालय त्या लवकरच सुरू करणार आहेत ही स्वागतार्ह गोष्ट आहे.त्यात औषधोपचाराबरोबर संगीतोपचारासाठीही दोन खोल्या राखून ठेवाव्यात ही नम्र विनंती.

डॉ.सुरेश चांदवणकर

कार्यवाह, 'सोसायटी ऑफ इंडियन रेकॉर्ड कलेक्टर्स'

दूरभाष ०२२ - २२८०४९८६

chandvankar.suresh@gmail.com